**राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यरत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तकांच्या मोबदल्यात वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आशा -५६२२/प्र.क्र.२२६/२१/आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १० एप्रिल, २०२३

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.बैठक-०२१९/प्र.क.१६९/आरोग्य-७ दिनांक १६ सप्टेंबर, २०१९.
२. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.बैठक-०२१९/प्र.क.१६९/आरोग्य-७ दिनांक ०७ जुलै, २०२०.
३. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.एनएचएम-११२१/प्र.क्र.६८/२१/ आरोग्य-७ दिनांक ०९ सप्टेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमांतर्गत राज्यातील आशा स्वयंसेविकांना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार एकुण ७८ सेवांपैकी नियमित ४ सेवांसाठी केंद्र शासनाकडून राष्ट्रीय आरोग्य अभियानातुन रु.२०००/- इतका मोबदला अदा करण्यात येतो. केंद्र शासनाच्या प्राप्त होणा-या मोबदल्याच्या समप्रमाणात कमाल रु.२०००/- पर्यंत राज्य शासनाच्या निधीतुन संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, गटप्रवर्तक यांनाही राज्य शासनाच्या निधीतुन रु.३०००/- इतका मोबदला देण्यास संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. तसेच, संदर्भ क्र. (३) येथील शासन निर्णयान्वये आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना राज्य शासनाच्या निधीतुन अदा करण्यात येत असलेल्या अनुक्रमे दरमहा रु.२०००/- व रु.३०००/- या मोबदल्यात अनुक्रमे दरमहा रु.१०००/- व रु.१२००/- अशी एकुण अनुक्रमे रु.३०००/- व रु.४२००/- अशी वाढ तसेच, रु.५००/- प्रतिमहा कोविड भत्ता अदा करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सद्यस्थितीत आशा स्वयंसेविका यांना राज्य शासनाचे दरमहा रु.३५००/- व केंद्र शासनाचे रु.३०००/- असा एकुण रु.६५००/- इतका मोबदला अदा करण्यात येतो. तसेच, गटप्रवर्तक यांना राज्य शासनाचे रु.४७००/- व

केंद्र शासनाचे रु.८७७५/- असा एकुण रु.१३४७५/- मोबदला अदा करण्यात येतो. कोविड महामारीचे सावट अदयापही जगावर असल्याने त्याचा विचार करुन शेवटच्या घटकापर्यंत आरोग्य सेवा देणा-या आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक या दोन्ही घटकांच्या भुमिका महत्वाचा असल्यामुळे त्यांना दिल्या जाणा-या मोबदल्यात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिनांक १७ मार्च २०२३ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांची राष्ट्रीय आरोग्य अभियानातील शेवटच्या घटकापर्यंत आरोग्य सेवा पुरविण्यातील भूमिका व महत्व विचारात घेऊन आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना राज्य निधीतून मोबदला देण्याबाबत शासनाने पुढीप्रमाणे निर्णय घेतले आहेत.

१. आशा स्वयंसेविका यांना राज्य शासनाच्या निधीतून अदा करण्यात येणा-या दरमहा रुपये ३५००/- या मोबदल्यात दरमहा एकूण रुपये १५००/- एवढी वाढ करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. गटप्रर्वतक यांना राज्य शासनाच्या निधीतून अदा करण्यात येणा-या दरमहा रुपये ४७००/- या मोबदल्यात दरमहा एकूण रुपये १५००/- एवढी वाढ करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त अ.क्र. १ व २ मध्ये प्रस्तावित केलेली वाढ १ एप्रिल २०२३ या महिन्यापासून देय होणा-या मोबदल्यात अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. यासाठी सन २०२३-२४ या अर्थसंकल्पिय वर्षामध्ये होणा-या अंदाजे रुपये ५०७.७७ कोटी इतक्या वार्षिक आवर्ती खर्चास मान्यता देण्यात येत आहे.तसेच रुपये ५०७.७७ कोटी इतक्या वार्षिक आवर्ती खर्चाची तरतुद आगामी पावसाळी आधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर योजना सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात दिनांक ०१.०४.२०२३ पासून अंमलात येईल व त्यानुसार आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तकांना सदर वाढीव मोबदला दिनांक ०१.०४.२०२३ पासून २२१०H०१५ या लेखाशिर्षातून अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक १७.०३.२०२३ रोजीच्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७९/१४७२, दिनांक · १४.१२.२०२२ व

वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.विवि/शिकाना/१७३, दिनांक २३.१२.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१०१७१८५०३५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY DHONDU DAGALE

Digitally signed by SANJAY DHONDU DAGALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=91c5ac1bc356eb88dac279997c206f0bc13ac253742cc3f97488b07c83657b5f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02E1EAC848EB66AA47BB931E6668D24F8AEF7B3F3FA0341F35962CC85B518C62, cn=SANJAY DHONDU DAGALE
Date: 2023.04.10 17:26:53 +05'30'

**( संजय डगळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव (५ प्रती) (पत्राने)
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५ प्रती), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
५. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानसभा व विधानपरिषद सदस्य
६. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.
८. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
९. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई.
१०. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर,
११. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
१२ महाप्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
१३. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
१४. प्रबंधक, मा. लोकायुक्त व मा. उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१६. मा. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
१७. वित्त विभाग/ व्यय- १३, मंत्रालय, मुंबई-
१८ नियोजन विभाग / कार्यासन १४७२, मंत्रालय, मुंबई.
१९.सर्व विभागीय आयुक्त
२०. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई-

२१ सर्व जिल्हाधिकारी,

२२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

२३. संचालक (आरोग्य सेवा-१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई

२४. संचालक (आरोग्य सेवा-२) आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे

२५. अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई

२६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, माताबाल संगोपन व शालेय आरोग्य पुणे

२७. उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये

२८. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक, (FWB मार्फत)

२९. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, (FWB मार्फत)

३०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

३१. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई

३२. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे

३३. सर्व कोषागार अधिकारी

३४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)

३५.भारती जनता पार्टी,महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईट, मुंबई -४०००२०

३६. इंडियन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग दादर , मुंबई -४०००२५

३७.राष्ट्रवादी कॉग्रेस पार्टी, राष्ट्रपती भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पाईंट, मुंबई-४०००२१.

३८. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००१

३९. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई- ४००००१

४०. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई

४१. भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई

४२. सार्वजनिक आरोग्य विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई- ४००००१

४३. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-७)